**स्वातंत्र्यदिनाच्या वर्धापन दिनी आयोजित करण्यात येणाऱ्या अल्पोपहारासाठी निविदांची छाननी व इतर अनुषंगिक बाबींची तपासणी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन निभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सीईआर-२०१८/प्र.क्र.१३७/३०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ५ जुलै , २०१८.

**शासन परिपत्रक :-**

दरवर्षी, दिनांक १५ ऑगस्ट, स्वातंत्र्यदिनाच्या वर्धापन दिनी मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या हस्ते मंत्रालयाच्या प्रांगणात ध्वजारोहण करुन मुख्य शासकीय समारंभ साजरा केला जातो. सदर समारंभाचा भाग म्हणून, मा.मुख्यमंत्री महोदयांमार्फत पदवीदान सभागृह, मुंबई विद्यापीठ, मुंबई किंवा त्या वेळी ठरविण्यात येईल अशा ठिकाणी , सायंकाळी ५-०० वाजता मा.मंत्रिमंडळ सदस्य, परदेशी वाणिज्यदूत, भारतरत्न-पद्म पुरस्कार प्राप्त व इतर विविध पुरस्कार प्राप्त मान्यवर, उच्च न्यायालयाचे मा.न्यायमूर्ती, विधानमंडळ सदस्य इ. निमंत्रीत मान्यवरांसाठी स्नेहोपहार आयोजित करण्यात येतो.

२. सदर समारंभा प्रसंगी अल्पोपहारासाठी अनुभवी पुरवठादारांकडून मर्यादित ई-निविदा प्रक्रिये व्दारे दर मागविण्यात येतात. या निविदांची छाननी व इतर अनुषंगिक बाबींची तपासणी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अ.मु.स/प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी | : | अध्यक्ष |
| २ | उप सचिव, राजशिष्टाचार-३०, सामान्य प्रशासन विभाग | : | सदस्य |
| ३ | अवर सचिव, राजशिष्टाचार-३०/३१, सामान्य प्रशासन विभाग | : | सदस्य |
| ४ | कक्ष अधिकारी, राजशिष्टाचार-३०, सामान्य प्रशासन विभाग | : | सदस्य सचिव |

३. सदर समिती, दर वर्षी प्राप्त निविदांची छाननी व इतर अनुषंगिक बाबींची तपासणी करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१८०७०५१५०८४२३९०७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Gopalkrishna Gaikwad

Digitally signed by Rajendra Gopalkrishna Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e18e8c2154c8ecbcf0edc1fcc5b3e74c50aa53537f32c40ea2c1af9814e56681, cn=Rajendra Gopalkrishna Gaikwad
Date: 2018.07.05 15:09:53 +05'30'

**(रा. गो. गायकवाड)**
शासनाचे अवर सचिव

**प्रति:-**

१. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. उप सचिव (कार्यासन-३०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अवर सचिव (कार्यासन-३०/३१), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. कक्ष अधिकारी (कार्यासन-३०) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रत:-**

- निवडनस्ती (कार्यासन-३०)